दरभाव वाढीचा फरक मक्तेदारांना प्रदान करणे बाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
परिपत्रक क्रमांक : झेडपीए २००२/प्र.क्र.१७९/वित्त-९
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १४ मे,२००४.

वाचा :-१) शासन परिपत्रक,ग्रामविकास व जलसंधारण विभाग,क्र.झेडपीए १०९७/ प्र.क्र.१९४३/३३, दिनांक ४ सप्टेंबर, २०००.
२) शासन परिपत्रक,ग्रामविकास व जलसंधारण विभाग,क्र.झेडपीए २००२/ प्र.क्र.१७९/३३, दिनांक १४ नोव्हेंबर, २०००.

**शासन परिपत्रक :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाने त्यांच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी १०९१/ प्र.क्र.१२/टी-२, दिनांक १०/१/१९९२ अन्वये दरभाव वाढीचा फरक मक्तेदारांना प्रदान करण्याचे आदेश दिले होते. सदर आदेश जिल्हा परिषदेकडे कमी कालावधीच्या कामाचे स्वरुप लक्षात घेऊन जिल्हा परिषदांना लागू रहाणार नाही असे या विभागाच्या क्र.झेडपीए १०९७/ प्र.क्र.१९४३/३३, दिनांक ४ सप्टेंबर, २००० च्या परिपत्रकान्वये कळविण्यात आले होते. तथापि काही जिल्हा परिषदांनी त्यापूर्वीच निविदेत दरभाव वाढीचे कलम अंतर्भूत केल्याचे विभागाच्या लक्षात आले. त्यामुळे दिनांक ४ सप्टेंबर,२००० पूर्वीच्या निविदेत दरभाव वाढीचे कलम टाकण्यात आले असल्यास केवळ त्याच प्रकरणात दरभाव वाढ द्यावी तसेच जिल्हा परिषद व शासनामुळे निधी अनुउपलब्धता व अन्य कारणामुळे कामाच्या मुदतीत वाढ झाली असल्यास केवळ त्याच संदर्भात दरभाव वाढ देण्याबाबत विचार करता येईल असे या विभागाच्या क्र.झेडपीए २००२/प्र.क्र.१७९/३३, दिनांक १४ नोव्हेंबर, २००० च्या शासन परिपत्रकान्वये कळविण्यात आले होते.

२. जिल्हा परिषदेच्या काही कामांची मुदत २ ते ३ वर्षे असते. प्रामुख्याने अशी कामे लघुपाटबंधारे विभागात असतात. अशा कामांना विभागाचे वरील दोन्ही परिपत्रके लागू राहतील किंवा कसे याबाबत कोणत्याही सूचना शासनाव्दारे निर्गमित करण्यात आल्या नव्हत्या. या अनुषंगाने आता असे निर्देश देण्यात येत आहेत की, ज्या कामांची मुदत २ ते ३ वर्षे आहे व कामाचे मुल्य रु.५०.०० लाखाचे वर आहे अशा कामांसाठी या विभागाची वरील दोन्ही परिपत्रके लागू रहाणार नाहीत. अशा कामाबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.१०/१/१९९२ च्या शासन निर्णयान्वये दरभाव वाढ देण्यात यावी. 200108051634480O1

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( जयश्री चौधरी )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत :
१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
४. कार्यकारी अभियंता,लघुपाटबंधारे विभाग,जिल्हा परिषद,सर्व.
५. कार्यकारी अभियंता,बांधकाम विभाग,जिल्हा परिषद,सर्व.
६. मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा कोकण भवन,नवी मुंबई.
७. उपमुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा नवी मुंबई,पुणे,नाशिक,औरंगाबाद,नागपूर, अमरावती.
८. सर्व जिल्हा स्थानिक निधी लेखा अधिकारी,
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,नागपूर.
१२. महालेखापाल (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र राज्य,नागपूर.
१३. सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमा.२),मंत्रालय,मुंबई.
१४. पाटबंधारे विभाग,मंत्रालय,मुंबई.
१५. इतर सर्व मंत्रालयीन विभाग.
१६. ग्रामविकास व जलसंधारण विभागातील सर्व अधिकारी व कार्यासने.
१७. निवड नस्ती,कार्यासन क्रमांक वित्त-९,ग्रामविकास व जलसंधारण विभाग.